प्रधानमंत्री पोषण शक्ती निर्माण (PM-POSHAN) योजनेतंर्गत अनुसूचित जाती उपयोजनांतर्गत निधी वितरणाबाबत...
(सन २०२४-२५)

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शापोआ-२०२४/प्र.क्र.१२६/एस.डी.३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: २७ मार्च, २०२५

**वाचा:-**

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२३/प्र.क्र.१८४/एस.डी.३, दि.०८ मे, २०२४.
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२४/प्र.क्र.१२६/एस.डी.३, दि.०७ ऑक्टोंबर, २०२४.
३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२४/प्र.क्र.१२६/एस.डी.३, दि.१० ऑक्टोंबर, २०२४.
४) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२४/प्र.क्र.१२६/एस.डी.३, दि.२० फेब्रुवारी, २०२५.
५) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२४/प्र.क्र.१२६/एस.डी.३, दि.१८ मार्च, २०२५.
६) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२४/प्र.क्र.१२६/एस.डी.३, दि.२५ मार्च, २०२५.
७) केंद्र शासनाचे आदेश क्र. प्र. क्र.३-४/२०२४-Desk (PMP-५) दि.२६ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :**

प्रधानमंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेंतर्गत केंद्र शासनाने सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील मंजूर केंद्र हिस्स्याच्या निधीमधील पहिला, दुसरा व तिसऱ्या हप्त्याचा निधी राज्य शासनास उपलब्ध करुन दिला होता. सदरप्रमाणे केंद्र व राज्य हिस्स्याचा घटकनिहाय व लेखाशिर्षनिहाय निधी वितरीत करण्यात आलेला आहे. सद्यस्थितीत सदर योजनेंतर्गत दि.२६ मार्च, २०२५ रोजीच्या आदेशान्वये केंद्र शासनामार्फत चौथ्या हप्त्याचा केंद्र हिस्स्याचा रु.२८९८५.८६ लक्ष इतका निधी राज्य शासनास उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधीची विगतवारी सर्वसाधारण आणि अनुसूचित जाती या

घटकांतर्गत केली आहे. उपरोक्त केंद्र हिस्स्याच्या निधीपैकी अनुसूचित जाती उपयोजनांतर्गत केंद्र हिस्स्याचा रु.३६५२.२२ लक्ष इतका निधी आहे. सदर योजनेंतर्गत केंद्र व राज्य खर्चाचे प्रमाण ६०::४० असे आहे. तथापि, स्वयंपाकी तथा मदतनीस यांच्या रु.२५००/- प्रतिमाह मानधनामध्ये रु.६००/- केंद्र हिस्सा व रु.१९००/- राज्य हिस्सा आहे. त्यामुळे राज्य हिस्स्यामधून समरुप निधीपेक्षा जादा निधी वितरीत करणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने अनुसूचित जाती उपयोजनांतर्गत केंद्र हिस्स्याचा रु.३६५२.२२ लक्ष व राज्य हिस्साचा रु.२९८७.८८ लक्ष असा एकूण रु.६६४०.१० लक्ष इतका निधी वितरीत करणे आवश्यक आहे. तथापि, अनुसूचित जाती उपयोजनांतर्गत केंद्र व राज्य हिस्स्याच्या सदरप्रमाणे पूर्ण निधी वितरीत करण्याकरीता अर्थसंकल्पिय तरतूद पुरेशी नाही. सबब, सद्यस्थितीत अनुसूचित जाती उपयोजनांतर्गत अर्थसंकल्पित शिल्लक असलेला केंद्र हिस्स्याचा रु.७३७.७२ लक्ष व राज्य हिस्स्याचा रु.११३८.७३ लक्ष असा एकूण रु.१८७६.४५ लक्ष इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रधानमंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पिय तरतूदीमधून अनुसूचित जाती उपयोजनांतर्गत केंद्र व राज्य हिस्सा मिळून रु.१८७६.४५ लक्ष (रुपये अठरा कोटी शहात्तर लक्ष पंचेचाळीस हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रु.लक्ष)

| अ.क्र. | लेखाशिर्ष | सन २०२४-२५ मधील सुधारित अर्थसंकल्पीय तरतूद | यापूर्वी वितरीत केलेला निधी | शिल्लक अर्थसंकल्पिय तरतूद | वितरणास मान्यता देण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|
| १. | एन-३, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१, प्राथमिक शिक्षण ७८९, अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना (०१)(०५) प्रधानमंत्री पोषण शक्ती निर्माण (केंद्र हिस्सा ६०%) ३१ सहाय्यक अनुदाने वेतनेत्तर | रु.१३३००.०० | रु.१२५६२.२८ | रु.७३७.७२ | रु.७३७.७२ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | (२२०२। ७६४) | | | | |
| २. | एन-३, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१, प्राथमिक शिक्षण ७८९, अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना (०१)(०६) प्रधानमंत्री पोषण शक्ती निर्माण (राज्य हिस्सा ४०%) ३१ सहाय्यक अनुदाने वेतनेत्तर (२२०२। ७७३) | रु.१०५००.०० | रु.९३६१.२७ | रु.११३८.७३ | रु.११३८.७३ |
| | **एकूण** | **रु.२३८००.००** | **रु.२१९२३.५५** | **रु.१८७६.४५** | **रु.१८७६.४५** |

२. सदरचा शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या शासन परिपत्रक क्र.बीयुडी-२०२५/प्र.क्र.५/अर्थसंकल्प, दि.२० जानेवारी, २०२५ अन्वये तसेच, वित्त विभागाच्या शासन परिपत्रक दि.०८ जानेवारी, २०२५, दि.१२ फेब्रुवारी, २०२५ व दि.१७ मार्च, २०२५ अन्वये दिलेल्या निर्देशानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर निधी खर्च करताना केंद्र शासनाच्या दि.२६ मार्च, २०२५ रोजीच्या निधी वितरण आदेशामध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तींचे तंतोतंत पालन करण्यात यावे. तसेच, सदर आदेशामधील अनु.क्र.३(v) मध्ये नमूद केलेली माहिती तात्काळ केंद्र व राज्य शासनास पाठविण्याची दक्षता शिक्षण संचालक (प्राथ.), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी घ्यावी.

४. प्रस्तुत निधीच्या उपयोजनाकरीता आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी तसेच, राज्य समन्वय अधिकारी, प्रधानमंत्री पोषण शक्ती निर्माण योजना, स्वतंत्र कक्ष, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर निधी केंद्र व राज्य शासनने वेळोवळी दिलेले निर्देश/आदेश/शासन निर्णय/परिपत्रक/सूचना यांना अनुसरुन विहित कालावधीत खर्च करण्याची दक्षता शिक्षण संचालक (प्राथ.) महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी घेण्यात यावी. तसेच, सदर निधी खर्च केल्यानंतर याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

६.    प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२७१२५०२१४०२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAMOD ABAJI PATIL

Digitally signed by PRAMOD ABAJI PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPARTMENT, 2.5.4.20=4a3b99d57d257e955ed34ca51db1f3c521002555e05c455e86fa1c9c82a1d82b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=68D5A8ABFFDD75CBA24301AA39C12B40983F304D7267796A32B42D4D558F1A1F, cn=PRAMOD ABAJI PATIL
Date: 2025.03.27 12:52:03 +05'30'

**(प्रमोद पाटील)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री, शालेय शिक्षण, यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
६) सर्व मा. संसद सदस्य/ विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य
७) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
९) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
११) शिक्षण संचालक (माध्य. व उच्च माध्य.), महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) शिक्षण संचालक (योजना), महाराष्ट्र राज्य, पुणे
१३) शिक्षण संचालक (प्राथ.), महाराष्ट्र राज्य, पुणे
१४) शिक्षणाधिकारी (प्राथ.), जिल्हा परिषद (सर्व)
१५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ , मुंबई/नागपूर
१६) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१७) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
१८) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई
१९) नियोजन विभाग, कार्यासन १४७१, मंत्रालय, मुंबई
२०) निवड नस्ती - एस.डी. ३